**मौजे शिंदे ता.जि.नाशिक येथील जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्राची स.नं.१५९०/२ येथील १.६० हे.आर पैकी १.२० हे.आर जागा ग्रामीण रुग्णालयाच्या प्रयोजनार्थ जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक यांचे नावे वर्ग करण्याकरिता महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व पंचायत राज विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : जिपज -२०२३/प्र.क्र.२९२/योजना-११**
बांधकाम भवन, २५, मर्झबान मार्ग , फोर्ट , मुंबई ४००००१.
दिनांक - १५ मार्च , २०२४.

**संदर्भ** :- १. महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र. जमीन०४/२००६/प्र.क्र.३५/ज-१, दि.०८.०९.२००८
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्रमांक/आरोग्य/नियो/०३/२०२३,नाशिक दि.०४.१२.२०२३.
३. महसूल विभागाची अनौ.सं.क्र१९/२०२३ दि.०८.१२.२०२३ ची टिप्पणी.

**प्रस्तावना** :-

महसुल व वनविभागाच्या संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकान्वये महसूल विभागाच्या परवानगी शिवाय शासकीय जमीनींच्या हस्तांतरणावर निर्बंध घालण्यात आले आहेत. त्यामुळे विभागीय आयुक्त नाशिक यांनी मौजे शिंदे ता.जि.नाशिक येथील प्राथमिक आरोग्य केंद्राची स.नं.१५९०/२ येथील १.६० हे.आर पैकी ०.४० आर जागा प्राथमिक आरोग्य उपकेंद्रा साठी राखीव ठेवून उर्वरित १.२० हे.आर जागा ग्रामीण रुग्णालयासाठी जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक यांचे नावे वर्ग करण्याचा प्रस्ताव महसूल व वन विभागाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुसार महसूल विभागाने "जिल्हा परिषदेच्या अधिनस्त असलेली प्रस्तावाधिन जमीन प्राथमिक आरोग्य केंद्राच्या श्रेणीवर्धनासाठी आवश्यक असल्याने महसूल विभागास वर्ग करण्याची विनंती केली आहे . तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये या प्रस्तावास अनुकुलता दर्शविली आहे. त्याअनुषंगाने कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे शिंदे ता.जि.नाशिक येथील जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्राची स.नं.१५९०/२ येथील १.६० हे.आर पैकी ०.४० आर जागा प्राथमिक आरोग्य केंद्र पळसे अंतर्गत येणाऱ्या मौजे शिंदे उपकेंद्रा साठी राखीव ठेवून उर्वरित १.२० हे.आर जागा ग्रामीण रुग्णालयाच्या प्रयोजनार्थ जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक यांचे नावे वर्ग करण्याकरिता महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त परिच्छेद-१ मधील मान्यतेस अनुसरुन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी प्रस्तावाधिन जमीनीचा प्रत्यक्ष ताबा तात्काळ जिल्हाधिकारी, नाशिक यांना अथवा त्यांनी नियुक्त केलेल्या प्राधिकारी/अधिकारी यांचेकडे सोपवावा. सदरहू जमीनीचा ताबा देण्यापूर्वी त्यांनी जमीन प्रत्यार्पित

करताना जमिनीचा निश्चित कोणता हिस्सा प्रत्यार्पित करावयाचा आहे, याबाबत जिल्हाधिकारी, नाशिक यांच्या सल्ल्याने जमीनीचे आरेखन निश्चित करुन व मोजणी करुन जमीन प्रत्यार्पित करावयाची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महसूल विभागाने अनौ.सं.क्र.१९/२०२३ दि.०८.१२.२०२३ नुसार केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२००५२३१४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.15 21:56:30 +05'30'

(का.गो.वळवी)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री(गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.उपमुख्यमंत्री(वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. मंत्री ( ग्रामविकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग, बांधकाम भवन, मुंबई,
९) जिल्हाधिकारी, नाशिक,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद , नाशिक,
११ ) जिल्हा आरोग्य अधिकारी, नाशिक,
१२) कार्यासन योजना-११ संग्रहार्थ .